राष्ट्रीय कृषि विकास योजना RKVY-RAFTAR अंतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरिता सन २०२२-२३ मधील अनुसूचित जातीचा दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राशेअ-४४२२/प्र.क्र.१५८/८-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १३ मार्च, २०२३

**संदर्भ:-**

१. केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या संकेत स्थळावरील राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सुचना.
२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. ०३१७/प्र.क्र.१८/राकृवियो कक्ष, दि. १३.४.२०१७
३. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण विभागाचे पत्र क्र. १-१/२०२०-RFS-III (८२६३२), दिनांक १२.४.२०२२
४. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण विभागाचे पत्र क्र. १-१/२०२०-RFS-III, दिनांक २३.६.२०२२
५. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. राशेअ ४४२२/प्र.क्र. १२०/८ अे, दिनांक १४.७.२०२२
६. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. राशेअ ४४२२/प्र.क्र. १५८/८ अे, दिनांक ३१.१०.२०२२
७. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण विभागाचे पत्र क्र. १-२१/२०१८-RFS-III (pt), दिनांक २.२.२०२३
८. कृषि आयुक्तालयाचे क्र. वि.प्र.३/कोक्षेवि/अनु./४३१२/२३, दि. ६.२.२०२३
९. सामाजिक न्याय विभागाचा शासन निर्णय क्र. बीजीटी २०२२/ प्र.क्र.५८/ अर्थसंकल्प (विघयो), दिनांक १० मार्च, २०२३

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास (Rain fed Area Development) कार्यक्रम अंमलबजावणी करण्यात येत होती. तथापि, केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण विभागाने संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) हा कार्यक्रम राष्ट्रीय कृषि विकास योजना RKVY कॅफ्टेरिया अंतर्गत घेण्याबाबत सूचित केले आहे. त्याकरिता केंद्र व राज्य हिश्श्याचे अनुदानाचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण विभागाने संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये सन २०२२-२३ या वर्षासाठी केंद्र हिस्सा रु.२०००.०० लाख व राज्य हिस्सा रु.१३३३.०० लाख अशा एकूण रु. ३३३३.३३ लाख रकमेच्या वार्षिक कृती आराखड्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमाच्या वार्षिक कृति आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ करीता अनुसूचित जाती

प्रवर्गाकरिता केंद्र हिस्सा रु. २२०.०० लाख व राज्य हिस्सा रु.१४८.०० लाख अशा एकूण रु.३६८.०० लाख रकमेची अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे.

संदर्भ क्र. ६ च्या शासन निर्णयान्वये या योजनेसाठी प्राप्त पहिल्या हप्त्याचा केंद्र हिस्सा रु.५९.०० लाख उपलब्ध करुन दिला आहे. त्यास समरुप व राज्य हिस्सा रु. ३९.३३ लाख असा एकूण रु.९८.३३ लाख निधी वितरीत केला आहे.

केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण विभागाने संदर्भ क्रमांक ७ येथील दिनांक २.२.२०२३ च्या पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजना RKVY-RAFTAR अंतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमासाठी सन २०२२-२३ मध्ये अनुसूचित जातीकरिता दुसऱ्या हप्त्याचा केंद्र हिस्सा रु.५९.०० लाख उपलब्ध करुन दिला आहे. त्यास समरुप व राज्य हिस्सा रु. ३९.३३ लाख असा एकूण रु.९८.३३ लाख निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

१. कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमांसाठी RKVY-RAFTAR अंतर्गत सन २०२२-२३ मध्ये अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता आयुक्त (कृषि) यांना दुसऱ्या हप्त्याचा निधी रु. ९८.३३ लाख (रुपये अठ्ठयाण्णव लाख तेहत्तीस हजार फक्त) अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे पुढीलप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

**( रू. लाखात)**

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|
| **अनुसूचित जाती** | **५९.००** | **३९.३३** | **९८.३३** |

२. सदर रु. ९८.३३ लाख निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| **अनुसूचित जाती** | मागणी क्र. एन-३,<br>२४०१ बी १६१ (०१) (०९) कृषि उन्नती योजना राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान<br>(केंद्र हिस्सा-६० टक्के)<br>(कार्यक्रम) (२४०१ बी १६१)<br>३३- अर्थसहाय्य | मागणी क्र. एन-३,<br>२४०१ बी १७९ (०१) (१०) कृषि उन्नती योजना राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान<br>(राज्य हिस्सा-४० टक्के)<br>(कार्यक्रम) (२४०१ बी १७९)<br>३३- अर्थसहाय्य. |

३. या शासन निर्णयान्वये वितरीत निधी कोषागारातून आहरित करण्याकरिता आयुक्त (कृषि) यांना नियंत्रक अधिकारी व सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय यांना आहरण व संतिरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. केंद्रिय कृषि मंत्रालयाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी राज्य शासनास सन २०२१-२२ करीता मंजूर केलेल्या कृति आराखड्यानुसार आणि वेळोवेळी केंद्रिय

कृषि मंत्रालयाने दिलेल्या दिशानिर्देशानुसार सदर अभियानाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील. याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरून अभियानाचे संनियंत्रण करावे, त्याचप्रमाणे अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाकरीता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निदेशित करावे.

५. सदर योजनेची अंमलबजावणी केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांमधील अवर्षण प्रवण क्षेत्र घटकाच्या मार्गदर्शक सूचनांनूसार तसेच संदर्भाधीन अ.क्र. २ येथील उन्नत शेती समृद्ध शेतकरी अभियानाच्या दिनांक १३ एप्रिल, २०१७ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांनुसार करण्यात यावी.

६. संदर्भ क्र. ९ येथील सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांच्या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे सर्व अटींचे काटेकोरपणे पालन होईल याची दक्षता घेण्यात यावी

७. प्रत्येक महिन्याला योजनेची भौतिक आणि आर्थिक प्रगती याबाबतची माहिती अद्ययावत करण्यात यावी व राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांसोबतच्या परिशिष्ट-३ मध्ये भरण्यात यावी व सदरची माहिती राज्य शासनाकडेसुद्धा पाठविण्यात यावी.

८. या योजनेंतर्गत लाभार्थ्यांची निवड व अनुदान मंजूरीची कार्यवाही महा-डीबीटी प्रणालीद्वारे करावी आणि लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बॅंक खात्यावर अनुदानाची रक्कम सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीद्वारे जमा करावी.

९. योजनेचा सविस्तर त्रैमासिक प्रगती अहवाल पुढील त्रैमासिकाच्या पहिल्या महिन्यांच्या १० तारखेपर्यंत त्याचप्रमाणे वार्षिक प्रगती अहवाल आर्थिक वर्ष संपल्यानंतर ३ महिन्यांच्या कालावधीत कृषी, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषी मंत्रालय, भारत सरकार यांच्याकडे तसेच राज्य शासनाकडे पाठविण्यात यावा.

१०. कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाच्या उद्दिष्टपूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन अ.क्र. १ येथे नमुद केलेल्या केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असलेल्या सदर घटकाच्या मार्गदर्शक सूचना तसेच उपरोक्त नमूद अटी व शर्ती विचारात घेऊन उद्दिष्ट निहाय सविस्तर मार्गदर्शक सुचना क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात.

११. अनुसूचित जाती प्रवर्गसाठीचा निधी अनुसूचित जाती व नवबौध्द लाभार्थ्यांकरीता खर्च करण्यात यावा.

१२. अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना योजनेचा लाभ कोणत्या स्वरुपात देण्यात आला, याबाबतची सन २०२०-२१ तसेच २०२१-२२ सन या वर्षातील माहिती सामाजिक न्याय विभागास सादर करण्यासाठी, शासनास सादर करण्यात यावी.

१३.सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाकित दि. ४ एप्रिल, २०२२ व ८ फेब्रुवारी, २०२३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर परिपत्रकातील अटी शर्तीची पूर्तता करुन तसेच संदर्भाधीन अ.क्र. ९ येथील सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक १०.३.२०२३ च्या शासन निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१४.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१३१७०५५०४१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2023.03.13 17:10:19 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (कृषि), महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०० ०३२.
२. विधान सभा/विधान परिषद सदस्य,
३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. प्रधान सचिव (सा. न्या. व वि. स. वि.), महाराष्ट्र राज्य, सा. न्या. व वि. स. विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
५. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
८. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व),
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र, मुंबई/नागपुर
११. महालेखापाल (लेखा परीक्षण) महाराष्ट्र, मुंबई/नागपुर
१२. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१३. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
१४. सह सचिव/उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी (सर्व) (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. वित्त विभाग (का. व्यय-१/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय,मुंबई
१६. निवडनस्ती ८-अे.